बाल नेटाक्षरी

संपादिका  : सौ अनघा हिरे (नाशिक)

सजावट  : सौ. अनघा हिरे

मुखपृष्ठ :   नाम गुम जायेगा

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

9869674820

E mail : balnetakshari@gmail.com

9422284116

# नेटवरची धम्माल मस्ती

बच्चे कंपनी

पंधरा वर्षांपुर्वी लोकांना इंटरनेट माहित नव्हतं. ATM नव्हतं. मोबाईल नव्हते. बहुतेक लोक कॉम्प्युटर शिवायच काम करायचे. अजून पंधरा वर्षांनंतर इंटरनेट शिवाय कसलंच काम होणार नाही अशी परिस्थिती असेल. आता तुम्ही जी मुलं आहात ती मोठी झाल्यावर तुमचं पान इंटरनेट शिवाय हलणार नाही बुवा. पण तरीही तुमचे आई बाबा तुम्ही इंटरनेट्ला हात लावला की तुम्हाला रागावतात का ? इंटरनेट वर जास्त बसू देत नाहीत का ?

कारण माहित आहे ? इंटरनेट जितकं चांगलं तितकंच वाईट. इंटरनेटवर फ़सवणूक पण खूप असते. काय बघावं काय बघू नये याचं मार्गदर्शन नसेल तर मुलं कुठल्या कुठे वाहत जाऊ शकतात. फ़सू शकतात. कॉम्प्युटर बिघडू शकतो. व्हायरस येतात.

त्यात इंटरनेटवर जिकडे जावं तिकडे इंग्रजीच इंग्रजी. मग आपण मराठी मुलांनी करायचं काय? आपल्याला आपलं मराठी इंतरनेट हवं की नको ? तेव्हा ई साहित्य प्रतिष्ठानने आणलंय मुलांसाठी खास मासिक. बालनेटाक्षरी. यात मराठी मुलांना लिहायला वाव आहे. आणि माहिती मिळायलाही. यातून आपण इंटरनेट कसं वापरायचं. काय बघायचं, काय टाळायचं ते सगळं समजून घ्यायचं आहे. तुम्हाला आपल्या मित्रमंडळींना काही सांगायचं असलं, गोष्ट, कविता लिहायची असली किंवा आपण काढलेली चित्रं फ़ोटो दाखवायचे असले तर आमच्या कडे पाठवून द्या. पालकांना आणि दादा ताईंना सुद्धा विनंती. आपल्या कडच्या छोट्टु कंपनीने काही कौतुक करण्यासारखं केलं बनवलं लिहीलं तर आमच्याकडे पाठवा. आपण आज कौतुक केलं तरच ती मुलं उद्या काही पराक्रम करणार ना !

आमचा पत्ता :

balnetakshari@gmail.com

# अनुक्रमणिका

# चिंगीचा निर्धार....संध्या पेडणेकर

चिंगी तशी अगदी गोड मुलगी होती.



गोरा रंग, लालचुटुक ओठ, गोबरे गाल, मोठाले, डोळे नाक थोडं चपट होते पण कुरळ्या, दाट, काळ्याभोर, लांब केसांच्या बटा दोन्ही खांद्यांवरून पुढे आल्या कि कुणाचे मुळी तिच्या नाकाकडे लक्षच जायचे नाही.

आई तिला लाडाने चिंगी म्हणायची. पण बाबा म्हणायचे, `या दांडगोबाला चिंगी हे नाव शोभते तरी का? आपण तिला ठोंब्या म्हणणार!'



तर, अशी ही चिंगी उर्फ ठम्या उर्फ ठोंब्या उर्फ शमा. नाजूक, गोंडस असली तरी नसती उचापती आणि बंडखोर. मनाला येईल तशी वागण्याची तिला एकदा का हुक्की आली की मग तिच्यापुढे ब्रह्मदेवानेही हात टेकले असते!



उद्यापासून चिंगीच्या शाळेला उन्हाळ्याची सुट्टी लागणार होती. रात्री झोपण्यापूर्वी तिने दहादा आईला बजावले, `ए आई, उद्यापासून मी कॉलनीतल्या मुलींबरोबर खेळायला जाणार आहे. अगदी सकाळी. आम्ही सगळ्यांनी ठरवलंय तसं, मला लवकर जागे करशील ना?'

`करीन चिंगी, पण तू उठशील असे मला काय वाटत नाही. अगं, आजच तुझी परीक्षा संपली न? सुट्टीत उशिरा उठून खूप वेळ गादीतच लोळत पडणार असं तू वर्षभर घोकत होतीस.'



`हो ग आई, पण, आमच्या बाईंनी काल शाळेत सांगितले की, सुट्टीत लवकर उठून खेळा, व्यायाम करा, त्यामुळे तब्बेत सुधारते आणि उंचीही वाढते. मला खूप खूप उंच व्हायचंय, उठाव्शील ना ग?' चीन्गीने आईला गळ घातली. `बर बाई, उठवीन हं,' आई हसत म्हणाली.

हसणारी आई चिंगीला खूप आवडते. रागावलेली आई चिंगीला मुळीच आवडत नाही.

तशी तिची आई रागीट नाहीये,, पण कधी कधी चिंगी कडनच चूक घडते. अन आई रागावते. आई रागावली की चिंगी अगदी पक्क ठरवते की आता पुन्हा कधी चूक करायची नाही पण कितीही ठरवल तरी कशा कोण जाणे, चिंगीच्या हातून चुका घडतातच.



सकाळी जाग करायसाठी आई चिंगीजवळ गेली तेव्हा चिंगी अगदी गाढ झोपेत होती. झोपेत तिला सुंदर स्वप्नही पडलं असावं. झोपेत ती हसत होती. तिला जागे करणे आईच्या अगदी जीवावर आले. पण आईने जागे केलं नसतं तर जागी झाल्यावर चिंगीने रडून नुसता धिंगाणा घातला असता.



कपाळावरून हात फिरवत आई चिंगीला म्हणाली, चिंगी बाळ, उठायचय ना तुला? अग, सहा वाजले.' आईच्या बोलण्याचा चिंगीवर ढिम्म काही परिणाम झाला नाही. आईने मग चिंगीची चादर काढली आणि खांदे



धरून तिला हळुवार हालवले. `चिंगे, अग उठ! लवकर ना उठायचय तुला?'

`अं, झोपू दे ना आई.' चिंगीने पुन्हा चादर ओढून घेतली.

आईने मग तिच्या गालावर चापट्या मारत म्हटलं, `चिंगे, अग, तूच काल सांगितलं होतस उठवायला. तुझ्या मैत्रिणी येणार आहेत ना खेळायला? तुला नाही का जायचं?'




`मला नाही जायचं. झोपू दे ना मला आई. तुझी राजची कटकट!' चिंगीने पेंगतच वैताग व्यक्त केला.

`आजपासून शाळेला सुट्टी आहे. आज तरी झोपू दे मला, प्लीज!'

बोलता बोलता चादर तोंडावर ओढून चिंगीने आईकडे पाठ फिरवली. मग मात्र आईने चिंगीला उठविण्याचा प्रयत्न केला नाही. आई स्वयंपाकघरात निघून गेली. चिंगीने पुन्हा ताणून दिली.

चिंगीला जाग आली ती कर्कश्श वाजणार्या बेलमुळे. ``नक्की तो दूधवाला राजा असणार. त्याला किती वेळा सांगितलंय हळू बेल वाजवायला!पण




तो गधडा काही सुधारत नाही. आईही त्याला कधी रागावत नाही. `लहान वयात त्याला किती अवघड कामं करावी लागतात,' असं तिचं म्हणण. आता आहे तो लहान म्हणून एव्हढ्या मोठ्याने बेल वाजवायची? झोप मोडली न माझी!''

चरफडत चिंगी जागी झाली.



आई स्वयंपाकघरात गेल्यावर ती जेव्हा पुन्हा झोपली तेव्हा तिला इतकं भयंकर स्वप्न पडलं होते. स्वप्नात चिंगी कोणत्यातरी नदीत पडली होती. आणि एक अगडबंब अष्टपाद आपले आठही हात परजत तिच्या मागे लागला होता. त्या एकडोळ्या अष्टपादाचा चेहरा अगदी भयानक होता. त्याचा एक हात चिंगीपर्यंत येणार एव्हढ्यात चिंगी जागी झाली. अष्टपाद समुद्रातच असतात हे जागे झाल्यानंतर तिच्या लक्षात आलं आणि तिने सुटकेचा सुस्कारा सोडला.

आळस देत चिंगीने चादर दूर सारली. बेडरूमच्या खिडकीवरचा पडदा सरकावलाआणि ती खिडकीत उभी राहिली. सकाळचे कोवळे उन अंगणात पसरले होते आणि .....आणि हे काय? झर्रकन चिंगीच्या डोळ्यावरची झोप उडाली. कॉलनीतल्या तिच्या सगळ्या मैत्रिणी समोरच्या पटांगणात खेळत होत्या. किती सुंदर सुंदर कपडे घातले होते



त्यांनी. बूट आणि पायमोजे घालून अगदी रुबाबदार दिसत होत्या.



चिंगीच स्वताकडे लक्ष गेलं. शी! पिंजारलेले केस, चिकट डोळे, ओठांच्या कोपर्यातून निघालेली सुकलेल्या लाळेची रेघ आणि चुरगळलेला नाईट सूट! आपला अवतार पाहून चिंगीला कससंच झाले.

पाय आपटत चिंगी स्वयंपाकघरात गेली. तक्रारीच्या स्वरात आईला म्हणाली, ``आयडे, मला लवकर जाग कर असं सांगितलं होत ना मी तुला? का जागे केलं नाहीस?'' आई म्हणाली, ``चिंगी, अग, केला मी प्रयत्न, पण तू उठायला तयारच नव्हतीस.'' ``गदा गदा हल्वाय्चास, उठून बसवायचस...,'' चिंगीने भुण भुण लावली. आई म्हणाली, ``अग, आता महिनाभर सुट्टी आहे ना?''



`किर्रर्र !' दारावरची बेल वाजली.

बाबांनी दार उघडले आणि तिथूनच हाक मारली, ``ठम्या, अग तुझ्या मैत्रिणी आल्यात!''

``मावशी, मला तहान लागलीय, पाणी हवय,'' अपर्णा म्हणाली.

`शमी, तू खेळायला का नाही आलीस?' सायलीने विचारले. चिंगी काही बोलणार एवढ्यात जान्हवी म्हणाली, `

`शमाराणी आता जागी झालेली दिसते". तिचं टोमणा मारणार हे वाक्य पूर्ण होत न होत तोच सगळ्यांचा `अय्या!' असा एकत्र चीत्कार चिंगुला ऐकू आला. पाठोपाठ सगळ्यांचं खिदळण ऐकून चिंगी खजील झाली. वरमून गेली. शरमेन तिची मान खाली गेली. डोळ्यात पाणी दाटून आले.



``अग पोरींनो, मीच आज तिला जागी करायला विसरले. उद्या ती नक्की येईल हं खेळायला."

आईचे बोलणे ऐकून चिंगीचा जीव भांड्यात पडला. चिवचिवाट करत चिंगीच्या मैत्रिणी निघून गेल्या आणि चिंगी थेट आईच्या कुशीत शिरली. आईच्या पदरात तोंड लपवतानाही मैत्रिणींचे ताजेतवाने चेहरे तिच्या नजरेसमोरून हालत नव्हते. चिंगीने मग पक्का निर्धार केला, सुट्टी असो वा नसो, रोज सकाळी लवकरच उठायचं.

*******************************************

# घाटातील वाट



घाटातील वाट,
काय तिचा थाट,
मुरकते गिरकते,
लवते पाठोपाठ ।।

निळी निळी परडी,
कोणी केली पालथी,
पान फुलं सांडली,
वर आणि खालती ।।

खाली खोल दरी,
वर उंच कडा,
भला मोठा नाग,
जणू वर काढून फणा ।।

भिऊ नका कोणी,
पाखरांची गाणी,
सोबतीला गात गात,
खळाळतं पाणी ।।



- सरिता पदकी

## सकाळ' ... कवि-अरुण.वि.देशपांडे-पुणे.



छान पहाटे
रोज उठावे
खूप पाहावे
निसर्ग रूप .....||
रोज सकाळी
पडावे बाहेर
हवेत ताज्या
वाटेल प्रसन्न....||
सूर्य उगवतो
प्रकाश देतो
निरपेक्षपणे
साऱ्याजगताला .....||

arunvdeshpande@gmail.com

## सुट्टीतील मजा......... मंजिरी दाभोळकर



उन्हाच्या झळा, गरम गरम वाफा
तापलेली धरणी, पडलेल्या भेगा
आगीच्या ज्वाळा, गुलमोहराचा सडा ।



तापलेलं वातावरण, हवामानाचा अंदाज
पायाला चटके, सावलीला आमराई
अंगाची लाहीलाही, हवीहवीशी थंडाई ।

वाळवणाची तयारी, साठवणाची सुरुवात
वाळतात पापड, कडकडीत उन्हात
राखण करणाऱ्या, मुलांची धमाल ।



उन्हाचा मोसम, शाळांची सुट्टी
मामाच्या गावाला, आगगाडीची शिट्टी
आंब्याचा आमरस, फणसाची पोळी
काजुचा गर, करवंदाची जाळी ।



मोकळ्या अंगणात, शीतल चांदण्यात
भुतांच्या गोष्टी, भितीची दाटी
आजीच्या कुशीत, प्रेमाची महती ।

...... मंजिरी दाभोळकर
manjee15@yahoo.com

# कविताची गंमत



कविता एके दिवशी खूप खूप आजारी पडली होती.म्हणजे कविताला गोळ्या-औषधे घ्यावीच लागणार ! पण आपली कविता आहे खूप नाटकी,गोळ्या-औषधे ही नकोच ! आईच्या खूप विनवण्या ऐकून तिने एक गोळी खाल्ली. पण आता तर अजून ४ गोळ्या उरल्या होत्या . आईला एक कल्पना सुचली. आईने त्यागोळ्या पेढ्यांत लपवून कविताला पेढे खायला दिले. कविताला पेढे खूप आवडले आणि तिने ते फस्त केले. आईला वाटले की कविताने पेढ्यामधील गोळ्या सुद्धा खालल्या असतील पण तितक्यात कविताने आईला विचारले की, "आई ही बी कुठे फेकू?"

तन्मयी हिरे

७वी

# जगाची ओळख



नवीन पुस्तकाची ओळख
नवीन वेबसाईटची ओळख

# मुलांनी वाचण्या सारखे खूपकाही छान छान

## एक होता कार्व्हर




वीणा गवाणकर यांचे 'एक होता कार्व्हर' हे अतिशय सुंदर पुस्तक मराठी भाषेत उपलब्ध आहे . या पुस्तकात जॉर्ज वाशिंग्टन कार्व्हर यांच्या जीवन प्रवासाचे वर्णन केले आहे . या पुस्तकात त्यांच्या जिद्दीचे वर्णन केलेले आहे.निग्रो असल्यामुळे मिळणारी वागणूक आणि त्याला सामोरे जाण्याची ताकद ह्या असामान्य माणसात होती, आणि ह्याच कारणामुळे ते मोठे वनस्पती शास्त्रज्ञ झाले . जगण्यासाठी बरेच संघर्ष करावे लागतात हा उद्देश या पुस्तकाचा आहे.या सर्वांचे वर्णन वीणा गवाणकर यांनी सुंदर शब्दात केले आहे.

-आदिती हिरे.

# मराठी वेब साईट

http://www.avakashvedh.com/




सर्वांनाच नसेली तरी अवकाशाबद्दलची जिज्ञासा बहुतेकांना असते. विविध क्षेत्रांमध्ये मराठी भाषा प्रगती करीत

असताना खगोलशास्त्र आणि अवकाश-विज्ञान या विषयामध्ये देखिल इंटरनेटच्या माध्यमातून मराठी माणसाचे

ज्ञान वाढावे या उद्देशाने अवकाशवेध.कॉमची निर्मिती केली गेली आहे. अवकाश वेध ही मराठीतली पहिली खगोलशास्त्र आणि अवकाश-विज्ञान या विषयावरील वेब साईटआहे

# सुडोकू 1

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 3 | 1 | 2 | | 9 | 5 | | 7 | 6 |
| 5 | | 9 | 1 | | 7 | | 8 | 2 |
| 4 | | 7 | 2 | 6 | 3 | 5 | | |
| 9 | | | 7 | | | 2 | 4 | |
| | 2 | 8 | | 1 | | | 9 | 3 |
| | 3 | | 9 | 8 | 2 | | 5 | 7 |
| | 4 | 5 | 6 | | | | 3 | 1 |
| 1 | 7 | | 3 | 5 | 8 | 9 | | 4 |
| 8 | | 3 | 4 | 2 | | 7 | | 5 |

तुम्हाल माहित आहे आपले.. केस किंवा नखे कापताना दुखत का नाही...?

उत्तर..: कारण आपली नखात आणि केसात.. रक्त वाहिनी नसते..

खाली एकूण किती गोल आहे ? कोण बरोबर उत्तर देणार ?



## प्रात:प्रार्थना

वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥

## हात पाहून म्हणावयाचा श्लोक

कराग्रे वसते लक्ष्मी : करमुले सरस्वती ।
करमध्ये तु गोविन्द : प्रभाते करदर्शनम ॥

## भोजनश्लोक

वदनि कवळ घेता नाम घ्या श्रीहरीचे
सहज हवन होते नाम घेता फुकाचे ।
जीवन करी जिवित्वा अन्न हे पूर्णब्रम्ह
उदरभरण नोहो जाणिजे यज्ञकर्म ।

## सायंप्रार्थना

*संध्याकाळी देवासमोर दिवा लावून म्हणावयाची प्रार्थना*

शुभं करोति कल्याणं आरोग्यं धनसंपदा ।
शत्रुबुध्दीविनाशाय दीपज्योति नमोऽस्तुते ॥

# आभाळ रिकामं होतय ... - मुकता कावळे ८ वी



पाऊस मनमुराद हसतोय ...
पाऊस रस्त्यावर नाचतोय ...
पाऊस झाडांवर झुलतोय ...
आभाळ रिकामं होतय ...

पाऊस पक्षांच्या गळ्यात गुंजतोय ...
पाऊस वार्याबरोबर शीळ वाजवतोय ...
पाऊस पानांवर हिरे फेकतोय ...
आभाळ रिकामं होतय ...

पाऊस गारेच्या रुपात मोती बनवतोय ...
पाऊस प्रत्येकाला आनंद वाटतोय ...
पाऊस लोकांमध्ये प्रेम भरतोय ...

आभाळ रिकामं होतय ...

पाऊस मनामनात वसतोय ...
पाऊस रागारागात भिनतोय ...
पाऊस माणसाला वेड लावतोय ...
आभाळ रिकामं होतय ...

पाऊस मातीला सुगंध देतोय ...
पाऊस झाडाशी काहीतरी बोलतोय ...
पाऊस हिरवी शाल अन्थरतोय
पाऊस निसर्गाला नव रूप देतोय ...
आभाळ रिकामं होतय ...

पाऊस खिडकीतल्या कॉफीत भिजतोय ...
पाऊस मैत्री जपतोय ...
पाऊस जीवन जगतोय ...
पाऊस आयुष्य वाटतोय ...
आभाळ रिकामं होतय ...

==========================

घरगुती वस्तू वापरून केलेली वेशभूषा









माझा प्रश्न असा आहे “की आई मला जास्त टीव्ही का बघू देत नाही?” ...रेणू

... तर बाळा, आईला तुझी काळजी आहे ना.. तू जास्त टीव्ही बघितला तर तुझे डोळे खराब होतील आणि हा मोठ्या मोठ्या भिंगांचा चष्मा तुला लागला तर तू बाहुली सारखी छान छान नाही ना दिसणार . म्हणून .. शमजल का?



## डोक्याचा खेळ .... उत्तर




गोल ..४१

# संपादकाचा प्रेमळ हट्ट

छोट्या  दोस्तांना बालदिनाच्या हार्दिक शुभेच्छा !!

काय म्हणते दिवाळी? दिवाळीत काय काय मजा केली?

मग छोट्या दोस्तानो कसे वाटले तुम्हाला बालनेटाक्षरीचे हे मासिक?

थोडा अभ्यास थोडे वाचन, थोडी मस्ती आणि थोडी मजा  हे सर्व एकत्र घेऊन आलो आहोत खास छोट्या दोस्तांसाठीच !

तुमचे लिखाण आम्हाला balnetakshari @gmail.com  ह्या पत्त्यावर जरुर पाठवावे.

आम्हाला तुमचे छान छान चित्र , कविता कथा पाठवा. आपले काही प्रश्न तुम्ही आम्हाला जरुर विचारू शकता. चला मग लागा कामाला,

अं हं, लागा लिहायला !!!!!

*अनघा हिरे*

---

मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांना इंटरनेटवर मानाचे स्थान असावे या उद्देशाने अनेक संस्था आणि व्यक्ती आज काम करत आहेत. ई साहित्य प्रतिष्ठान त्यातलीच एक. नेटाक्षरी हे **कवितांचे** ई साप्ताहिक, ई स्टाप हे **विनोदा**ला वाहिलेले ई नियतकालिक, दुर्ग दुर्गट भारी ही महाराष्ट्रातील दुर्ग **किल्ल्यांची माहिती** देणाऱ्या ई पुस्तिकांची मालिका, **स्वरनेटाक्षरी** हे मराठीतले पहिले ऑडिओ ई नियतकालिक, मराठी कसे लिहावे, ई पुस्तक कसे बनवावे, **शास्त्रीय संगीत** कसे ऐकावे (संगीत कानसेन) आदी ई लर्निंगची साधने, आणि आजवर प्रसिद्ध झालेली अनेक ई पुस्तके अशा आजवरच्या **दिडशेहून प्रकाशनांचा** पल्ला ई साहित्य प्रतिष्ठानने गाठला आहे. **सुमारे एक लाख वाचकांपर्यंत ही प्रकाशने पोहचतात.**




लहान मुलांना इंटरनेटच्या जगात प्रवेश करायला उपयोगी पडावे म्हणून सुरू केलेला बालनेटाक्षरी हा प्रयत्न आपल्याला कसा वाटला ते कळवा. तसेच ई साहित्य प्रतिष्ठान ची इतर प्रकाशने विनामूल्य मिळण्यासाठी लिहा व भेट द्या.

नवीन प्रकाशने नियमित मिळण्यासाठी

esahity@gmail.com

आजवरची प्रकाशने वाचण्यासाठी

www.esahity.com